**अध्यक्ष तथा प्रमुख संपादक, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांच्या कार्यालयीन कामासाठीच्या वाहन सुविधेवरील खर्चात वाढ करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विनिमं-२०१४/प्र.क्र.११५/भाषा-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २ मार्च, २०१५.**

<u>वाचा</u> :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च, २०१०,
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक-शासाउ-१०.१०/प्र.क्र.९६/१०/सा.उ., दिनांक १३ मार्च, २०१२.
३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र.सासंमं-१०१४/प्र.क्र.५६/२०१४/भाषा-३, दि.१८.११.२०१४.

<u>प्रस्तावना</u> :-

मराठी भाषा विभागाच्या संदर्भाधीन दि.१८.११.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाच्या दिनांक १३ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयाप्रमाणे राज्य स्तरीय समिती/परिषद/आयोग यांच्या अध्यक्ष (सर्वसाधारण) यांना अनुज्ञेय असलेल्या सेवा-सुविधा महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या अध्यक्षांना लागू केल्या आहेत. तथापि अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांच्या कार्याची व्याप्ती व स्वरुप विचारात घेऊन त्यांना देण्यात आलेल्या कार्यालयीन कामासाठी वाहन सुविधेवरील इंधन व तेलावरील खर्चाची प्रतिमाह रू.६०००/-ची मर्यादा वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

<u>शासन निर्णय</u> :-

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे प्रमुख संपादनाचे काम वाई, जि.सातारा येथे होत असल्याने अध्यक्ष तथा प्रमुख संपादक, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांना मुंबई ते वाई असा प्रवास महिन्यातून २-३ वेळा करावा लागतो. त्यामुळे वाहन खर्चावरील होणारा खर्च रू.६०००/- च्या मर्यादेत भागविणे शक्य होत नाही. सबब, वित्त विभागाच्या दिनांक १३ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयाप्रमाणे लागू करण्यात आलेली रू.६०००/- प्रतिमाह ची मर्यादा रू.१०,०००/- इतकी वाढविण्यास "एक विशेष बाब" म्हणून शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच भविष्यात या प्रकरणाचा पूर्वोदाहरण म्हणून कोणत्याही प्रकरणी संदर्भ करण्यात येणार नाही या अटीच्या अधीन राहून ही वाढ करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

यासाठी होणारा खर्च मंडळाच्या मागणी क्र. झेडएफ-०२, २२०५ - कला व संस्कृती, १०२ - कला व संस्कृती प्रचालन, (०१) (०२) - मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, १३- कार्यालयीन खर्च (२२०५ ३१८१) या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१०९३/१४/व्यय-४, दिनांक २७.१.२०१५ अन्वये प्राप्त झालेल्या मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०३१६०७४४५२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vrushali Vasant Sawant

Digitally signed by Vrushali Vasant Sawant
DN: c=IN, o=Goverment of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vrushali Vasant Sawant
Date: 2015.03.03 16:17:54 +05'30'

**( वृषाली व. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
५. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
६. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
७. सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९. सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१०. वित्त विभाग (व्यय -४/सार्वजनिक उपक्रम/सेवा- ५ ), मंत्रालय, मुंबई,
११. सर्व अवर सचिव/सर्व कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. भाषा - २ (संग्रहार्थ).